**जिल्हा मृद सर्वेक्षण आणि मृद अन्वेक्षण व मृद विश्लेषण प्रयोगशाळा जिल्हा मृद चाचणी प्रयोगशाळांचे भाडे व कर अदा करण्याकरीता निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: पुरक १५२०/प्र.क्र.०७/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २० मार्च, २०२०.

<u>वाचा</u> :- १) जा.क्र.कृआ/मृसमृचा/मु.सा/२६५८/२०२०, दिनांक २२ जानेवारी, २०२०_

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील ३१ जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळा जिल्हा मुख्यालयी कार्यरत आहेत. सदर प्रयोशाळापैकी ८ प्रयोगशाळा खाजगी भाड्याच्या जागेत व २३ शासकीय इमारतीमध्ये कार्यरत आहेत. शेतकऱ्यांना त्यांच्या शेतकऱ्यांच्या मृदेची तपासणी करुन विहीत केलेल्या कालावधित जमीन आरोग्य पत्रिका वितरीत करण्यात येतात तसेच, केंद्र शासनाच्या जमीन आरोग्य पत्रिका या महत्वाकांक्षी प्रकल्प, इतर योजनांतर्गत व शेतकऱ्यांकडुन प्राप्त होणाऱ्या मृद नमुन्याचे विश्लेषण करण्यात येऊन जमीन आरोग्य पत्रिकांचे वितरण करण्यात येते.

राज्यातील जिल्हा मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळेचे भाडे व कर अदा होण्यासाठी सन २०१९-२० मध्ये लेखाशिर्ष २४०२ ००३२ या लेखाशिर्षांतर्गत भाडे व कर (१४) याबाबीखाली रु.२२.५२ लाख इतक्या अनुदानाची तरतुद करण्यात आली आहे. सदर तरतुदिपैकी रु.१३.५१ लाख अनुदान माहे एप्रिल ते डिसेंबर, २०१९ या कालावधीसाठी वितरीत करण्यात आलेली असून माहे डिसेंबर, २०१९ अखेर वितरीत करण्यात आलेली सर्व रक्कम खर्च झालेली आहे. सदर घटकांसाठी मंजुर तरतुदी व्यतिरीक्त रु.३३.०० लाख इतका निधी प्रयोगशाळांचे इमारतीचे भाडेपट्टी व शासकीय इमारतीचे करांची रक्कम अदा करणे आवश्यक असल्याने रु.३३.०० लाख इतकी रक्कम पुरक मागणीद्वारे प्रस्तावित करण्यात आली होती. सदर पुरक मागणी मान्य झालेली असल्याने सदरची तरतुद वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

जिल्हा मृद सर्वेक्षण आणि मृद अन्वेक्षा व मृद विश्लेषण प्रयोगशाळा (अनिवार्य) या राज्य पुरस्कृत योजनेतंर्गत प्रयोगशाळांच्या भाडेपट्टी व शासकीय इमारतीच्या कराची रक्कम अदा करण्यासाठी रु.३३.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| लेखाशिर्ष |
| --- |
| **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०२००३२ मृद व जलसंधारण,<br>(००)(१०१), मृद सर्वेक्षण व चाचणी<br>(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि मृद अन्वेक्षा व मृद विश्लेषण प्रयोगशाळा<br>(२४०२००३२) (अनिवार्य)<br>भाडेपट्टी व कर (१४) |

३. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत /P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक /तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना बी.डी.एस. (BDS) प्रणालीव्दारे वितरीत करण्यात यावी.

५. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९, वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक २२ जानेवारी २०२० मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३२०१५०३१०३४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.03.20 15:07:45 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
७. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. सह सचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई